**मा. न्यायधिकरण यांच्या आदेशानुसार गृह (परिवहन) विभागातील उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची पदस्थापना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी ०६२१/प्र.क्र.१६१/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ३० डिसेंबर २०२१

वाचा - १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमव्हीडी ०९२०/प्र.क्र.१७४/परि-४, दि.०८.०१.२०२१.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमव्हीडी ०१२०/प्र.क्र.४/ परि-४, दि.१९.०४.२०२१.

**शासन निर्णय -**

मुळ अर्ज क्र.३६८/२०२१ या न्याय प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक ०१.१२.२०२१ रोजी दिलेल्या आदेशानुसार उपनिर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये श्री. जयंत रमेश चव्हाण, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, बीड येथील पदस्थापना व उपनिर्दिष्ट क्र. २ येथील शासन निर्णयान्वये श्री. सुबोध शिवाजीराव मेडसीकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी येथील पदस्थापना रद्द करण्यात येत असून, त्यांची खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक - ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. जयंत रमेश चव्हाण | उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, बीड | उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी |
| २ | श्री. सुबोध शिवाजीराव मेडसीकर | उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी | उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सिंधुदूर्ग |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दि. ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

३. संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांनी सदर बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करुन त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तातडीने रुजू होण्याबाबत सुचित करावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू व्हावे व पदभार स्विकारल्याचा अहवाल परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत शासनास सादर करावा.

५. सदर आदेश तात्काळ अंमलात येत आहेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३११२५६५०६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2021.12.31 12:57:28 +05'30'

**( भ. रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) परिवहन आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी रत्नागिरी/सिंधुदूर्ग.
१०) प्रादेशिक परिवहन अधिकारी पनवेल/औरंगाबाद.
११) संबंधित उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१२) निवडनस्ती (परि ४).